# कृत्रिमपायाचा बेट्स

लिन बाराश



मराठी
अश्विनी बर्वे

‘कृत्रिम पाया’चा क्लेटन बेट्स विसाव्या शतकातला महान टॅाप नर्तकांपैकी एक होता. जेव्हा तो तरुण होता तेव्हा क्लेटनला नृत्य करणे आवडत होते. पण बारा वर्षाचा असतांना एका कारखान्यात काम करतांना त्याचा डावा पाय गेला, तेव्हा तो परत चालायला लागेल अथवा नृत्य करेल अशी आशा कोणालाच नव्हती. पण क्लेटन ची नृत्य करण्याची इच्छाशक्ती अजूनही जिवंत होती. लवकरच त्याने कुबड्यांचा उपयोग करून नृत्य करण्यास सुरुवात केली. मग एका काठीचा पायासारखा उपयोग करून नाचू लागला. काही काळानंतर त्याचा लाकडाचा पाय त्याच्या दुसऱ्या नाचणाऱ्या पायाच्या क्षमतेशी जुळू लागला.

कृत्रिम पायाचा बेट्सने पूर्ण अमेरिका आणि यूरोपमध्ये नृत्य प्रदर्शित केले. त्यांनी आपल्या नृत्याच्या अनोख्या शैलीने लोकांची मनं जिंकली. ते अद्भुत शो-मॅन होते आणि प्रत्येकासाठी प्रेरणेचे स्त्रोत होते. दृढ संकल्प आणि जीवनावरील असीम प्रेमामुळे त्यांनी आपले दुर्देवावर विजय मिळवला. त्याचं सगळ्यात मोठं काम म्हणजे त्यांचे असाधारण जीवन होय. जे त्यांनी सगळ्यांसमोर ठेवलं.



१९१२ मध्ये दक्षिण कॅरोलिनात, क्लेटन बेट्स तेव्हा फक्त पाच वर्षाचे होते, पण त्यांना जेव्हा जेव्हा संधी मिळे तेव्हा ते नाचत. त्यांच्याजवळ नाचण्याचे बूट नव्हते, म्हणून ते नंग्या पावलांनी नाचत. त्यांच्याजवळ कोणतेही वाद्य नव्हते. म्हणून ते हाताने टाळी वाजवत आणि आपल्या पायांनी टॅप-टॅप आवाज करत नृत्य करत असत.



क्लेटनची आई शेतमजूर होती, ती एका गोऱ्या मालकाकडे कापूस पिकवत असे. तिला खूप कमी मजुरी मिळायची. गोरा मालक जी मजुरी देई ती घेण्याशिवाय त्यांच्याकडे दुसरा चारा नव्हता. त्याकाळा दक्षिण अमेरिकेच्या ग्रामीण भागात ही एक सामान्य गोष्ट होती.

क्लेटनला शेती अजिबात आवडत नसे. म्हणून शेतीच्या कामातून सुटका करून घेण्यासाठी तो शहरात नाव्ह्याच्या दुकानात जाई. तिथं त्याला त्याचे नृत्य कौशल्य बघणारे दर्शक मिळत असत.

नाव्ह्याच्या दुकानात क्लेटन गोऱ्या लोकांसाठी नृत्य करत असे. प्रयोगानंतर गोरे लोक त्याच्याकडे काही नाणी फेकत असत. तो त्यांच्यासाठी "बक" नृत्य करत असे. त्यावेळी त्याला हे माहित नव्हते की तो टॅप नृत्य करत आहे.

जेव्हा आईला आपल्या मुलाची आठवण येई तेव्हा ती क्लेटनच्या मागे पळत असे आणि गर्दीला म्हणत असे, "तुम्ही माझ्या मुलाचे  नाचणारे माकड करू नका." आणि मग ती क्लेटनला घरी घेवून येत असे.

पण त्यामुळे क्लेटनचा नाच बंद झाला नाही. त्याला कोणी थांबवू शकलं नाही. त्याला नाच करण्यात सगळ्यात जास्त मजा येत असे. नाचण्यासाठी जे काही करावे लागत असे ते सर्व तो करत असे.







जेव्हा क्लेटन बारा वर्षाचा झाला तेव्हा त्याने आपल्या आईला विचारले की तो शेतात काम करण्याऐवजी कपाशीच्या गिरणीत काम केले तर चालेल का? आईला त्याचे कारखान्यात काम करणे पटत नव्हते कारण त्यासाठी तो अजून लहान काही आठवड्यानंतर त्याने आईला परत विनंती केली, आई म्हणाली, “मी ही गोष्ट देवाला विचारेन, की काय करायला पाहिजे.”

दुसऱ्या दिवशी सकाळी आई “हो” म्हणाली. माहीत नाही ही देवाच्ची इच्छा होती की क्लेटनच्या जिद्दीपुढे आई थकली होती.

क्लेटन गिरणीत काम करू लागला. पण तिसऱ्या दिवशी एक भयानक घटना घडली.त्याचा डावा पाय मशीनमध्ये फसला. त्याचा पाय कापावा लागला. पण तो दवाखान्यात गेला नाही. १९१९ मध्ये दक्षिण अमेरिकेत एका काळ्या मुलाला दवाखान्यात नेणं अशक्य होतं. स्थानिक डॉक्टरांनी घरातील टेबलवरच त्याचं ऑपरेशन केलं.

क्लेटन परत चालू शकेल असा विचार कोणीच केला नव्हता.





आई रडत म्हणाली, “मी देवाचं म्हणणं चुकीचे ऐकले.”



आईने जे ऐकलं ते चूक होतं की बरोबर, पण क्लेटनचे आयुष्य आता कधी नेहमीसारखे होणार नव्हते. त्याच्यासाठी ते क्षण निराशेचे होते. पण त्याचा आत्मा असा होता की जो त्याला कशासमोर गुडघे टेकू देणार नव्हता. तो अजून तरुण होता आणि त्याचे जीवन उत्साहाने भरलेले होते. त्याच्या डोक्यात संगीताची लय होती, त्याला ती धून फक्त बाहेर काढायची होती.



लवकरच क्लेटनने बांबूपासून एक कुबडी तयार केली आणि त्याच्या साहय्याने तो चालू लागला.



लवकरच क्लेटन संगीताचा ताल कुबड्यांच्या साहाय्याने देवू लागला. त्याला त्यावर नाचायला आवडत असे. मग काकाने त्याच्यासाठी एक लाकडाचा पाय-एक खुंट तयार केला. त्या खुंटीच्या काठाला रबर होते ज्यामुळे तो घसरणार नाही आणि अर्धे चामडे होते, ज्यामुळे आवाज होईल. आपल्या उजव्या पायावर क्लेटन टॅप नृत्यासाठीचा विशेष बूट घातला.

क्लेटनने त्याच्यातून अद्भुत लय निर्माण केली. हळूहळू "कुबड्यांचा ताल" जमू लागला.

जेव्हा आईने क्लेटनकडे बघितले. तेव्हा तिने विचार केला, नृत्यातच त्याचं भविष्य आहे, आणि त्यासाठी त्याला कोणी थांबवणार नाही. कदाचित माझ्या क्लेटन साठी हेच सगळ्यात चांगलं असेल.





नाचतांना तो नेहमीसारखा पाय टाकत असे आणि
नृत्य करत असे.



तो  क्रँप रोल सुद्धा करत असे.



तो अजीब अशी कृती करत असे.



आणि पुलबैकपण करत असे.

पण जेव्हा कुबडीच्या साहाय्याने नृत्य करत असे, तेव्हा त्याच्या खास अंदाजात नृत्य करत असे. कोणीही याआधी टॅप नृत्यात असा अंदाज बघितला नव्हता.

कृत्रिम पायवाल्याने आपले करियर काळ्या दर्शकांसमोर नृत्य करून सुरु केलं. त्यांना याबाबत अभिमान होता. ते कपड्यांना अनुरूप होईल असा लाकडी पाय लावत असत.

कृत्रिम पायवाला नेहमी आपल्या नृत्याचा समारोप विशेष अमेरिकन “जेट विमान” नृत्याने करत असे. त्यासाठी ते मंचावर टॅप करत हवेत पाच फुट वर उडी मारत आणि मग दुसऱ्या पायाच्या खुंटीवर सरळ लॅन्ड होत, त्यावेळी त्यांचा दुसरा पाय हवेत पसरलेला असे. हे बघितल्या नंतर दर्शक उभे राहून टाळ्या वाजवत आणि त्यांना व्वा! व्वा! म्हणत.



त्यांनी इतर अशेव्त कलाकारांन बरोबर पूर्ण अमेरिकेचा प्रवास केला आणि विविध संगीत कार्यक्रमात नृत्य केले.






हळूहळू कुत्रिम पायावर नृत्य करणाऱ्या नृत्यकाराचा कार्यक्रमबघण्यासाठी दर्शकांची गर्दी होऊ लागली. गोऱ्या लोकांचे थिएटर जिथं फक्त गोरे कलाकार आणि दर्शकांना परवानगी होती, आता ते सुद्धा क्लेटनला बोलावू लागले. तिथं श्वेत नृत्यांगना आपला चेहरा काळा करून नाच करत असत. क्लेटन सुद्धा असाच मेकअप करून नृत्य करत असे. त्यामुळे कोणाला त्याच्या काळ्या रंगाचा पत्ता लागत नसे.

शो सम्पल्यावर क्लेटन आणि अन्य कलाकारांना थिएटरच्या जवळ खाण्याची परवानगी नव्हती. खाण्यासाठी त्यांना काळ्यांसाठी असलेल्या हॉटेल मध्ये जावं लागत असे. क्लेटनने हा अनुचित प्रकार एवढ्यासाठी सहन केला की त्याचे नृत्य चालू राहावे म्हणून.





शेवटी कृत्रिम पायधारी बेट्सला एवढी प्रसिद्धी आणि ओळख मिळाली की मग त्याला वेष बदलण्याची गरज पडली नाही. त्यांनी एड सुल्लिवन टेलीविजन शो आणि चित्रपटात नृत्य केलं. जेव्हा त्यांनी न्यूयॉर्कच्या हार्लेमच्या कॉटन क्लब मध्ये नृत्य केलं, तेव्हा ते एक स्टार - एक महान कलाकार झाले होते.



त्यांनी इंग्लडचा राजा आणि राणीसाठी सुद्धा नृत्य केलं.






जगभर शो केल्यानंतर आणि तिथं खाण्याच्या आणि झोपण्याच्या सोयीपासून वंचित राहावे लागल्यामुले क्लेटनने स्वतःचे एक रिसॉर्ट काढण्याचा निर्णय घेतला. तिथं त्यांनी अश्वेत लोकांचे नेहमीच स्वागत केले. १९५१ मध्ये त्यांनी न्यूयॉर्कच्या कैटस्किल डोंगरावर "कुत्रिम पाय बेट्स कंट्री क्लब" सुरु केला. पस्तीस वर्षापेक्षा अधिक काळ त्यांनी तिथं कार्यक्रम केले आणि आपल्या पाहुण्यांचे मनोरंजन केले.

अत्यंत विषम परिस्थितीत असून सुद्धा कुत्रिम पायाच्या बेट्सला कोणीही कोणतेही काम करण्यापासून अडवू शकले नाही.



तुम्ही काळे असा वा गोरे, तुम्हांला एक पाय असो या दोन, त्याने काहीही फरक पडत नाही. कारण चांगलं हे नेहमी चांगलंच असतं.

कृत्रिम पायधारक, दोन पायवाल्यासारखे चांगला टॅप डान्सर होता, किंवा त्यांच्यापेक्षा जास्त चांगला डान्सर होता. “माझ्याशी कोणी टक्कर देवू शकणार नाही, तसं तर अनेक लोकांनी प्रयत्न करून पाहिला आहे.”

“माझ्याकडे दयेने बघू नका. मी जो आहे त्यात मी आनंदी आहे. मला लाकडी पायाने टक-टक करायला आवडतं. जो पर्यंत मी कल्पना आणि जिमनास्टिक एकत्रित करेल तो पर्यंत कृत्रिम पायाचा बेट्स, एका पायावर नाच करणारा माणूस जिवंत राहील.



**क्लेटन “कुत्रिम पायाचा" बेट्स (१९०७ – १९९८)**

समाप्त